**कृषि उन्नती योजनेअंतर्गत अन्न व पोषण सुरक्षा (पुर्वीची एसएमएसपी योजना) या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत ग्रामबिजोत्पादन कार्यक्रम सन २०२४-२५ मध्ये राबविण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

<u>महाराष्ट्र शासन</u>

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्ध व्यवसाय विकास व मत्स व्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : योजना ३३२४/प्र.क्र.५५/१-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०९ जुलै, २०२४.

**<u>संदर्भ</u> :** १. कृषि आयुक्तालयाचे पत्र जाक्र.गुनि.१/२/एसव्हीएस/२०२४-२५/१४३०१, दि.२८.०५.२०२४.
२. राज्यस्तरीय मंजूरी समितीच्या ३५ व्या बैठकीचे इतिवृत्त, दि.१३.०५.२०२४.
३. केंद्र शासनाचे अ.शा. पत्र क्र. १३-२२/२०२३-PC, दि.१४.१२.२०२३.

**<u>प्रस्तावना:-</u>**

कृषि उन्नती योजने अंतर्गत अन्न व पोषण सुरक्षा (पुर्वीची एसएमएसपी योजना) या उपयोजनेंतर्गत ग्रामबिजोत्पादन कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना राज्यात ६० : ४० या केंद्र : राज्य हिश्श्याच्या प्रमाणात राबविण्यात येते. तसेच, राष्ट्रीय बियाणे राखीव हा १०० टक्के केंद्र पुरस्कृत घटक राज्यात महाबीज, अकोला यांचेमार्फत राबविण्यात येतो.

सन २०२४-२५ साठी केंद्र शासनाने बियाणे घटकासाठी रु.१७००.०० लाख निधी वाटप करण्यात येणार असल्याचे कळविलेले असून सदर Allocation च्या १२५ % च्या मर्यादेत वार्षिक कृती आराखडा तयार करण्याच्या सूचना संदर्भ क्र.०३ वरील पत्रान्वये देण्यात आलेल्या आहेत. सदरच्या २०२४-२५ च्या वार्षिक कृती आराखड्यामध्ये ग्रामबिजोत्पादन योजनेकरिता एकूण रक्कम रु. २१८२.५३ लाख (केंद्र हिस्सा रु. १३०९.५२ लाख व राज्य हिस्सा रु. ८७३.०१ लाख), सन २०२३-२४ चे प्रलंबित दायित्व एकूण रक्कम रु. १०४८.१७ लाख (केंद्र हिस्सा रु. ६२८.९० लाख व राज्य हिस्सा रु. ४१९.२७ लाख) असा एकूण रक्कम रु. ३२३०.७० लाख (केंद्र हिस्सा रु. १९३८.४२ लाख व राज्य हिस्सा रु. १२९२.२८ लाख) निधीचा समावेश आहे. कृषि आयुक्तालयाच्या संदर्भ क्र.०१ वरील प्राप्त प्रस्तावानुसार ग्रामबिजोत्पादन योजनेच्या सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या रु. ३२३०.७० लाख निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:**

कृषि उन्नती योजनेअंतर्गत अन्न व पोषण सुरक्षा (पुर्वीची एसएमएसपी योजना) या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत ग्रामबिजोत्पादन योजना सन २०२४-२५ मध्ये राबविण्याकरिता प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. ग्रामबिजोत्पादन योजनेंतर्गत सन २०२४-२५ मध्ये प्रवर्गनिहाय कार्यक्रमाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

(रक्कम रु. लाखात)

| प्रवर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकुण |
|---|---|---|---|
| अनुसूचित जाती | ५४३.९० | ३६२.६० | ९०६.५० |
| अनुसूचित जमाती | ३३०.२९ | २२०.१९ | ५५०.४८ |
| सर्वसाधारण | १०६४.२३ | ७०९.४९ | १७७३.७२ |
| एकुण | **१९३८.४२** | **१२९२.२८** | **३२३०.७०** |

सदर वार्षिक कृती आराखड्याचा बाब/घटकनिहाय आर्थिक तपशील सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये नमूद केलेले आहे.

२. सदर योजनेअंतर्गत होणारा खर्च चालू सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

**सर्वसाधारण**

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्रमांक-डी -३,<br>२४०१-पीक संवर्धन,<br>(००)(२३) कृषि उन्नती योजना,बियाणे व लागवड साहित्यावरील उपअभियान (केंद्र पुरस्कृत योजना) केंद्र हिस्सा - ६०%,<br>२४०१ ३९९५,<br>३३ अर्थसहाय्य, | मागणी क्रमांक-डी -३,<br>२४०१-पीक संवर्धन,<br>(००)(२७) कृषि उन्नती योजना,बियाणे व लागवड साहित्यावरील उपअभियान (केंद्र पुरस्कृत योजना) राज्य हिस्सा - ४०%,<br>२४०१ ए१५४,<br>३३ अर्थसहाय्य, |

**अनुसुचित जाती**

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्रमांक- एन-३<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(०१)(१९) कृषी उन्नती योजना बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (केंद्र पुरस्कृत योजना)<br>(केंद्र हिस्सा ६० %)<br>२४०१ बी २६८, (कार्यक्रम), ३३ अर्थसहाय्य. | मागणी क्रमांक- एन-३<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(०१)(२०) कृषी उन्नती योजना बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (केंद्र पुरस्कृत योजना)<br>(राज्य हिस्सा ४० %)<br>२४०१ बी २७७, (कार्यक्रम), ३३ अर्थसहाय्य. |

**अनुसुचित जमाती**

| **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
|---|---|
| **मागणी क्रमांक- टी-५**<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(०१)(२८) कृषी उन्नती योजना बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (केंद्र पुरस्कृत योजना)<br>(केंद्र हिस्सा ६० %)<br>२४०१ ए ६२८, (कार्यक्रम), ३३ अर्थसहाय्य. | **मागणी क्रमांक- टी-५**<br>२४०१ पीक संवर्धन,<br>(०१)(२९) कृषी उन्नती योजना बियाणे व लागवड साहित्य उप अभियान (केंद्र पुरस्कृत योजना)<br>(राज्य हिस्सा ४० %)<br>२४०१ ए ६३७, (कार्यक्रम), ३३ अर्थसहाय्य. |

३. सदर योजना राबविताना खालील अटी व शर्तीचे पालन करण्यात यावे.

१) सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधीन मार्गदर्शक सूचनांनुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार राबविण्यात यावी.

२) खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवुन सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत.

३) योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

४) योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरुवातील अखर्चित रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरुपात रकमा विचारात घेता येईल व सदिंग्धता राहणार नाहित.

५) कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

६) सदर योजनेकरीता मंजूर झालेला निधी हा ज्या संवर्गासाठी मंजूर केलेला आहे त्याच संवर्गासाठी खर्च होईल याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर योजनेकरीता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व त्यांच्या कार्यालयातील सहायक संचालक, लेखा-१ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर निधी खर्च करतांना विहित कार्यपध्दती अनुसरुन सर्व वित्तीय कायदे/ टेंडर नियामावली व नियमांचे/प्रक्रियेचे/वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत/P.W.D. म्यॅनूअलच्या अधिन राहून/C.V.C.तत्वानूसार/CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन निर्णय/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहिल.

६. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग तीन मधील अनुक्र.४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार विभागाच्या स्तरावर निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०७०९१५०४०८५२०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UMESH NARAYAN CHANDIWADE

Digitally signed by UMESH NARAYAN CHANDIWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CCBE80FCC6B64503B4E8B1269BD88D631F3F3C2BEF6E1CA70CC9A4E30954011F, cn=UMESH NARAYAN CHANDIWADE
Date: 2024.07.09 15:15:18 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
३) मा.प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ मर्यादित, महाबीज भवन, कृषिनगर, अकोला.
६) संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
९) सर्व विभागीय कृषि सहसंचालक.
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११) सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) अवर सचिव, कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई.
१४) निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

## परिशिष्ट अ

## कृषि उन्नती योजनेअंतर्गत (एसएमएसपी)- ग्रामबिजोत्पादन कार्यक्रम

**(रक्कम रु. लाख)**

| अ.क्र | योजना उपघटक | वित्तीय तरतूद |
|---|---|---|
| १ | गामबिजोत्पादन कार्यक्रम | |
| | (i) प्रमाणित बियाणे वितरण (तृणधान्ये, कडधान्ये व तेलबिया) | २१६७.५३ |
| | (ii) शेतकरी प्रशिक्षण | १५.०० |
| २ | गामबिजोत्पादन सन २०२३-२४ चे प्रलंबित दायित्व | १०४८.१७ |
| | **एकूण** | **३२३०.७०** |
| | केंद्र हिस्सा ६०% | १९३८.४२ |
| | राज्य हिस्सा ४०% | १२९२.२८ |